**अॅड. श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**खार पो.स्टे., येथे गु.प्र.क्र. १/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०१२१/प्र.क्र.१५/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २५.०४.२०२२

**संदर्भ** :- (१) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र. ५४/३४१/एसपीपी२०२१//'अ' शाखा,दि.२३.०९.२०.२१

(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९०७..२०१५.

(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णयः-**

खार पो.स्टे., येथे गु.र.क्र. १/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिकेच्या अनुषंगाने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून काम पाहण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये नियुक्त अॅड. श्री. प्रदिप घरत यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - ५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त)

ब) प्रति बैठक विचारविनिमय फी- रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अॅड. श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य पोलीस मुख्यालय (०२)(०१) शहर पोलीस अस्थापना-(२०५५ ००९७)- २८ व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशिर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२५११५०५४०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2022.04.25 11:52:54 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, बृहनमुंबई,
२. वरीष्ठ पोलीस निरिक्षक, खार पो.स्टे., मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा १-२) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
४. जिल्हा लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. ॲड. श्री. प्रदिप घरत,लक्ष्मी निवास, शॉप नं. ९, सुभाश रोड,ऑफ एन. एम. जोशी मार्ग, आर्थर रोड नाका, मुंबई- ४०००११
७. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (पोल-१०).